**मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील एस्प्लनेड न्यायालय इमारतीमधील जुने जॉली मेडउद्वाहन बदलून नवीन उद्वाहन बसविण्यासाठी निधीची उपलब्धता व निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. उद्ववा-०७१९/५२१/प्र.क्र.१२७/कार्यासन११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०४ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा</u>:-१) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W) ६०५३/१९८१ (१३)/१४५३/२०४०४/२०१९, दि.२९/६/२०१९

२) नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.१७३०/२०१९, दि.१५/४/२०१९

३) विधि व न्याय विभाग ज्ञापन क्र.उद्ववा-०७१९/५२१/प्र.क्र.१२७/कार्यासन११, दि.११/१२/२०१९

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.७८/अर्थ-३,दि.२०/७/२०२१

**प्रस्तावना:-**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील एस्प्लनेड न्यायालय इमारतीमधील जुने जॉली मेड उद्वाहन बदलून नवीन उद्वाहन बसविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भीय अ.क्र.१ येथील पत्रान्वये मा.उच्च न्यायालयाने सादर केला होता. त्यानुसार संदर्भिय अ.क्र.४ येथील शासन ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील एस्प्लनेड न्यायालय इमारतीमधील जुने जॉली मेड उद्वाहन बदलून नवीन उद्वाहन बसविण्याकरीता रु.३६,८५,०००/- इतक्या निधीची मागणी मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी केलेली होती. त्यानुसार याबाबत पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर करण्यात आला होता. यानुषंगाने निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील एस्प्लनेड न्यायालय इमारतीमधील जुने जॉली मेड उद्वाहन बदलून नवीन उद्वाहन बसविण्याकरीता लेखाशीर्ष (२०१४ ०२३४) खाली २७- लहान बांधकामे या उद्दिष्टांतर्गत रु. ३६,८५,०००/- (अक्षरी रुपये छत्तीस लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी विधान मंडळाने मंजूर केलेली आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु. ३६,८५,०००/- (अक्षरी रुपये छत्तीस लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास व वितरणास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर निधी नियंत्रक अधिकारी, मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यास व वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पुरवणी मागणी, "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान,(००) १०७ इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये, (००), (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२३४) २७- लहान बांधकामे " या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेली आहे. तसेच हा निधी नियंत्रक अधिकारी, मुख्य महानगर

दंडाधिकारी, मुंबई (जे-००४१) यांना वितरीत करण्यात येत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता योजिला आहे त्याच विवक्षित बाबींसाठी खर्च करणे अपेक्षित आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८००/व्यय ५, दि. १/९/२०२१अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००५१२११३४७८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2021.10.05 12:13:05 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) प्रबंधक (निरीक्षणे-२),उच्च न्यायालय, मुंबई.
२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग, कार्यासन-व्यय ५/ अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.
७) विधि व न्याय विभाग, कार्या- २३ व २४, मंत्रालय,मुंबई.
८) निवडनस्ती (कार्यासन ११).